सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये इन्फल्यूएंझा लस खरेदी करण्यासाठी साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उदिष्टाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये हाफकिन बायो फार्मा, कार्पोरेशन लि, मुंबई यांचेकडे वर्ग केलेल्या निधीतील शिल्लक असलेल्या रक्कम रु.२,३७,४०,५००/- मधुन रु. २, ३७,४०, ४२५/- (अक्षरी रुपये दोन कोटी सदतीस लक्ष चाळीस हजार चारशे पंचवीस फक्त) एवढया रक्कमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१९/प्र.क्र१८७/आरोग्य-८**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १८ जानेवारी, २०२२.

वाचा :-

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे-१ यांचे पत्र क्र.सआसे/संचालक कक्ष/ इन्फल्यूएंझा लस खरेदी कक्ष-५८/२१३६५-६९/२०२१, दिनांक ३१.१२.२०२१.

२) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-२०१९/प्र.क्र.१८७/आरोग्य -८ दि.०६.०१.२०२०.

३) शासन शुध्दीपत्रक सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-२०१९/प्र.क्र.१८७/आरोग्य -८ दि.११.११.२०२०

४) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मान्यता प्राप्त टिप्पणी, दिनांक २६.१२.२०२१

**प्रस्तावना:-**

सहसंचालक, आरोग्य सेवा, (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे-१ यांनी त्यांच्या दिनांक ३१.१२.२०२१ च्या प्रस्तावात नमूद केल्यानूसार सन २०२१-२२ या वर्षामध्ये इन्फल्यूएंझा लस खरेदी करण्यासाठी साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उदिष्टाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ मुंबई यांचेकडे वर्ग केलेल्या निधीतील शिल्लक असलेल्या रक्कम रु.२,३७,४०,५००/- मधुन रु. २, ३७,४०, ४२५/-

(अक्षरी रुपये दोन कोटी सदतीस लक्ष चाळीस हजार चारशे पंचवीस फक्त) एवढया रक्कमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सदर नस्तीवर विचाराधीन आहे .

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या वर्षामध्ये इन्फल्यूएंझा लस खरेदी करण्यासाठी साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उदिष्टाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ ,मुंबई यांचेकडे वर्ग केलेल्या निधीतील शिल्लक असलेल्या रक्कम रु.२,३७,४०,५००/- मधुन रु. २, ३७,४०, ४२५/- (अक्षरी रुपये दोन कोटी सदतीस लक्ष चाळीस हजार चारशे पंचवीस फक्त) इतका खर्च अपेक्षित असून सदरचा खर्च साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ मुंबई यांच्याकडे वर्ग केलेल्या अनुदानामधील शिल्लक असलेल्या रु. २,३७,४०,५००/- इतक्या अनुदानातून भागविण्यात येणार आहे.सदर बाबींच्या खरेदीसाठी खालील परिच्छेद क्र.०३ मध्ये नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे .सदर खरेदीसाठीचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

विवरणपत्र

अ- अनुदानाचा तपशिल

| अ.क्र. | लेखाशिर्ष | खरेदीचा तपशील | हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ मुंबई यांच्याकडे वर्ग केलेल्या अनुदानामधील शिल्लक अनुदान | खरेदीसाठीचा एकूण खर्च |
|---|---|---|---|---|
| १ | २२१०४२८६<br>साथरोगनियंत्रण कार्यक्रम<br>२१ - पुरवठा व सामुग्री | इन्फल्यूएंझा लस खरेदी | २,३७,४०,५०० | २,३७,४०,४२५ |

**ब- प्रस्तावित खरेदीचा तपशिल**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | खरेदीचा तपशील | हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ मुंबई यांच्याकडे वर्ग केलेल्या अनुदानामधील शिल्लक अनुदान | सन २०१९-२० चा लस खरेदीचा दर (रु) | खरेदी करावयाची लसींची संख्या | खरेदीसाठीचा एकूण खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २२१०४२८६ साथरोगनियंत्रण कार्यक्रम २१ - पुरवठा व सामुग्री | इन्फल्यूएंझा लस खरेदी | २,३७,४०,५०० | २२५ | १,०५,५१३ | २,३७,४०,४२५ |

**०२**. वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने सहसंचालक, आरोग्य सेवा, (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे-१ यांनी सन २०२१-२२ या वर्षामध्ये इन्फल्यूएंझा लस खरेदी करण्यासाठी साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उदिष्टाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ मुंबई यांचेकडे वर्ग केलेल्या निधीतील शिल्लक असलेल्या रक्कम रु.२,३७,४०,५००/- मधुन रु. २, ३७,४०, ४२५/- (अक्षरी रुपये दोन कोटी सदतीस लक्ष चाळीस हजार चारशे पंचवीस फक्त) एवढया रक्कमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यासाठी सादर करावयाची प्रमाणपत्रे (परिशिष्ट-अ) सादर केली आहेत. सदर प्रस्तावासाठी आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी त्यांच्या दिनांक २६.१२.२०२१ रोजीच्या टिप्पणीन्वये मान्यता दिली आहे.

**०३**. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार खालील अटींच्या अधीन राहून सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.

१) सदरहू साहित्य सामुग्रीची आवश्यकता खातरजमा/मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू साहित्य सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश

(Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. तसेच प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदर खरेदीसाठी अंदाजित रु. २,३७,४०,४२५/- इतका खर्च अपेक्षित असून, सदरचा खर्च साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ मुंबई यांच्याकडे वर्ग केलेल्या निधीतील शिल्लक अनुदान २,३७,४०,५००/- इतक्या अनूदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी - २०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, सहसंचालक, आरोग्य सेवा, (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे-१, आरोग्य सेवा संचालनालय ,मुंबई व संबंधित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०५. सदर बाबींवरील खर्च सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई यांचेकडे वर्ग केलेल्या निधीतील शिल्लक असलेल्या रक्कम रु.२,३७,४०,५००/- मधुन व प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच करण्यात यावा.

०६. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११३१११९४०९८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.18 14:16:21 +05'30'

**(वि.ल.लहाने)**
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.

४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यास्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
११) अधिकक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)